**लेक लाडकी या योजनेसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता अर्थसंकल्पित केलेला निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०२४/प्र.क्र.८९/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २१ मार्च,२०२५

**वाचा :-** १) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र. एबावि-२०२२/प्र.क्र.२५१/का.६, दिनांक ३०.१०.२०२३.
२) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र. एबावि-२०२४/प्र.क्र.११२/का.६, दिनांक १४.०८.२०२४.
३) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र. एबावि-२०२४/प्र.क्र.९८/का.६, दिनांक ०९.०९.२०२४.
४) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना नवी मुंबई यांचे पत्र क्र. एबाविसेयो / अंगणवाडी /का-७/Mid Media /माहिती/२०२४-२५/६५८४, दि. २९.११.२०२४
५) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र. एबावि-२०२४/प्र.क्र.८९/का.६, दिनांक २४.०६.२०२४, दि. ०१.१०.२०२४ व दि. २८.०२.२०२५.

**<u>शासन निर्णय :-</u>**

राज्यात दिनांक १ एप्रिल, २०२३ पासून मुलींच्या जन्मानंतर तिच्या सक्षमीकरणासाठी "लेक लाडकी" योजना सुरू करण्यास संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक ३०.१०.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

२. त्यानुषंगाने सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये या योजनेची जाहिरात प्रसिध्दी करण्याकरिता माध्यम आराखडा माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फ़त राबविण्यास संदर्भाधीन क्रमांक २ व ३ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्याप्रमाणे जाहिरात प्रसिध्दीची कार्यवाही करण्यात आल्यानंतर संबंधितांची देयके अदा करण्यास मान्यता व निधी उपलब्ध करून देण्याबाबतचा प्रस्ताव आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा यांचेकडून संदर्भाधीन क्रमांक ४ येथील पत्रान्वये प्राप्त झालेला आहे.

३. लेक लाडकी योजनेच्या जाहिरात प्रसिध्दीची देयके अदा करण्याकरिता तसेच सदर योजनेमधील लाभार्थ्यांना लाभ देण्याकरिता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात पुढील विवरणपत्रातील रकाना क्रमांक-१ मधील प्रधान लेखाशीर्ष/उपशीर्ष/उद्दिष्टामध्ये रकाना क्रमांक-२ मध्ये नमूद विद्यमान तरतुदीमधून रकाना क्रमांक-४ मध्ये दर्शविल्यानुसार एकुण रुपये ७.५० कोटी (अक्षरी रुपये सात कोटी पन्नास लक्ष फ़क्त) एवढा निधी वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये कोटीत)

| लेखाशिर्ष | विद्यमान तरतूद २०२४-२५ | यापूर्वी वितरीत तरतूद | या आदेशान्वये वितरित करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| मागणी क्र. एक्स-१<br>२२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण<br>०२- समाज कल्याण<br>१०३- महिला कल्याण<br>(२५) मुलींच्या सर्वांगीण विकासासाठी योजना<br>(२५) (०५) लेक लाडकी योजना (कार्यक्रम)<br>**२२३५ डी ५२४**<br>२०- इतर प्रशासकीय खर्च | ०.३५ | ०.३५ | ----- |
| २६ - जाहिरात व प्रसिध्दी | ३.५० | --- | ३.५० |
| ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) | ९४.५० | ६६.१५ | ४.०० |
| **एकूण** | **९८.३५** | **६६.५०** | **७.५०** |

४. उपरोक्त खर्च करताना यासंदर्भातील शासनाचे निर्णय / आदेश / परिपत्रक / वित्तीय नियमावलीतील तरतुदी / नियमावली इत्यादींचे पालन तसेच विहित कार्यपध्दतीचा अवलंब करण्याची जबाबदारी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांची राहील.

५. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांनी जाहिरात प्रसिध्दीकरिता मागणी केलेल्या तरतुदीपैकी सद्यस्थितीत वरीलप्रमाणे रुपये ३.५० कोटी एवढी तरतूद वितरीत करण्यात येत असून त्या मर्यादेत संबंधितांची देयके अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्यानुषंगाने संदर्भाधीन क्रमांक २ व ३ येथील शासन निर्णयांमध्ये नमूद बाबींची पूर्तता होत असल्याची खातरजमा करून आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांनी देयके अदा करण्याची कार्यवाही करावी. जाहिरात प्रसिध्दीकरिताची उर्वरित देयके अदा करण्यासंदर्भात आवश्यक तरतूद यथावकाश उपलब्ध करून देण्यात येईल. त्याचप्रमाणे लाभार्थ्यांना लाभ देण्याकरिता वितरीत करण्यात येत असलेल्या रकमेमधून लाभ अदा करण्याबाबतची कार्यवाही तात्काळ करण्यात यावी.

६. सदर निधी खर्च करताना संदर्भाधीन शासन निर्णयातील तरतुदी तसेच वेळोवेळी देण्यात आलेल्या सूचना विचारात घेऊन कार्यवाही करण्याची दक्षता आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी घ्यावी.

७. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक ८७/ व्यय-६, दिनांक १८.०३.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२११४०९२७५६३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2025.03.21 15:20:29 +05'30'

(वि. रा. ठाकूर)

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर,

२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

३) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई,

४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

५) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई,

६) सर्व जिल्हाधिकारी,

७) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद),

८) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास ) (जिल्हा परिषद),

९) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण/नागरी/आदिवासी) प्रकल्प,

१०) वित्त विभाग (व्यय/६ ,अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई,

११) नियोजन विभाग (का.१४७२), मंत्रालय,मुंबई,

१२) कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

त्यांना कळविण्यात येते की, त्यांनी BDS प्रणालीवर निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना वितरीत करावा.

१३) निवड नस्ती -का-६.